**सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.(माहे डिसेंबर २०१९ ते मार्च २०२०).**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-१३१९/प्र.क्र. ६३ /उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/२०१९-२०२०/प्र. क्र. ३५/प्रशासन-१, दि.०३ एप्रिल,२०१९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/२०१९-२०२०/प्र. क्र. ३५/प्रशासन-१, दि.१७ जुलै,२०१९.
३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.१४ ऑगस्ट २०१९.
४) अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे क्र. कार्यासन-९/लेखा/५७१५/५७१६, दि.३१ डिसेंबर, २०१९ चे पत्र.
५) शासन शुद्धीपत्रक समक्रमांक दि.३१ जानेवारी,२०२०.

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्रमांक तीनच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,मुंबई यांना माहे ऑगस्ट २०१९ ते नोव्हेंबर,२०१९ या चार महिन्यांचा खर्च भागवण्यासाठी ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांसाठी रूपये २११३.९६ लक्ष ( रूपये एकवीस कोटी तेरा लाख शहाण्णव हजार फक्त) इतके तसेच ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रुपये १३९.९४ लक्ष असे एकुण २२५३.४० लक्ष वितरित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयास, संदर्भ क्रमांक ५ च्या शासन शुद्धीपत्रकान्वये ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रुपये १२०.८४ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यांस मंजुरी देण्यांत आलेली आहे.

मंडळास माहे डिसेंबर, २०१९ ते मार्च, २०२० या ४ महिन्यांचा वेतन व वेतनेतर खर्च भागवण्यासाठी अनुदान उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

१. खादी व ग्रामोद्योग मंडळाने त्यांच्या संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये माहे डिसेंबर,२०१९ ते मार्च ,२०२० या ४ महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांसाठी रूपये २११३.९६ लक्ष तसेच ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) रूपये १३९.४४ लक्ष असे एकूण २२५३.४० (बावीस कोटी त्रेपन्न लक्ष चाळीस हजार फक्त ) इतके अनुदान वितरीत करण्याची विनंती केलेली आहे. मंडळास ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली मंजुर अर्थसंकल्पीय तरतूदीच्या (२७८.८८लक्ष) ६० टक्के मर्यादेत पुर्ण अनुदान वितरीत करण्यांत आलेले असल्याने ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाखाली रक्कम रू.२११३.९६ लक्ष (एकवीस कोटी तेरा लाख शहाण्णव हजार) इतके अनुदान वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) व ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टांखालील सन २०१९-२० या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८- भाग-१, उपविभाग-१, अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००२०३१६४०३९८६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Karansing Premsing Patil

Digitally signed by Karansing Premsing Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, serialNumber=c7feed7178d6c14666a5df36811f1763590e65b6f836a87e63789dc234173d66, cn=Karansing Premsing Patil
Date: 2020.02.03 16:44:30 +05'30'

( क.प्रे.पाटील )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

**माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
२) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
३) अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९) लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुं-३२.
११) कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (उद्योग-६).